**कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी या पदावर भारतीय प्रशासन सेवेतील अधिकारी नियुक्त करण्याबाबत....**

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१४/प्र.क्र.३२/का.१६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०१७.

**संदर्भ :-** (१) जनहित याचिका क्र.१८/२०११मध्ये दाखल दिवाणी अर्ज क्र.१२२४०/२०१३ मधील मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांचे आदेश दि.०२.०५.२०१४

(२) विशेष अनुमती याचिका (दि.) क्र.१९८५६/२०१४ मधील मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांचे आदेश दि.१७.०२.२०१७

**प्रस्तावना :-**

श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था (शिर्डी) अधिनियम- २००४ मधील कलम १३ अन्वये श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डीच्या व्यवस्थापन समितीसाठी कार्यकारी अधिकारी नियुक्त करण्याची तरतूद करण्यात आली आहे.सदर अधिनियमाच्या कलम १३(२) नुसार राज्य शासनाने कार्यकारी अधिकाऱ्यांची निवड ही, उप जिल्हाधिकाऱ्यांच्या दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेल्या अधिकाऱ्यांमधून करावयाची आहे.

२. मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल जनहित याचिका क्र. १८/२०११ मधील दिवाणी अर्ज क्र.१२२४०/२०१३ मध्ये दिनांक०२.०५.२०१४ रोजी कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी या पदावर आदेशाच्या दिनांकापासून ४५ दिवसांत भारतीय प्रशासन सेवेतील अधिकारी नियुक्त करण्याचे आदेश मा.उच्च न्यायालयाने दिले आहेत.राज्य शासनाने सदर आदेशाविरुध्द मा.सर्वोच्च न्यायालयामध्ये विशेष अनुमती याचिका क्र.१९८५६/२०१४ दाखल केली होती.

३. विशेष अनुमती याचिका क्र.१९८५६/२०१४ मध्ये कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था या पदावर भारतीय प्रशासन सेवेतील अधिकारी नियुक्त करण्याबाबत शासनाने यापूर्वी घेतलेल्या भूमिकेबाबत फेरविचार करण्याचे निदेश मा.सर्वोच्च न्यायालयाने दि.१३.०२.२०१७ रोजी दिले होते.सदर निदेशानुषंगाने सामान्य प्रशासन विभागाने कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी या पदावर भारतीय प्रशासन सेवेतील अधिकारी नियुक्त करण्याबाबत अनुकूलता दर्शविल्याने शासनाच्या वतीने दाखल केलेली विशेष अनुमती याचिका क्र.१९८५६/२०१४ मागे घेण्याचा निर्णय राज्य शासनाने घेतला आहे. सदर विशेष अनुमती याचिका मागे घेतल्याने मा.उच्च न्यायालयाच्या आदेशाप्रमाणे कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी या पदावर भारतीय प्रशासन सेवेतील अधिकारी नियुक्त करण्याबाबतची कार्यवाही दि १५.०३.२०१७ पुर्वी करण्याचे निदेश मा.सर्वोच्च न्यायालयाने दि.१७.०२.२०१७ रोजी दिले आहेत.

४. मा. सर्वोच्च न्यायालयाच्या उपरोक्त निदेशांस अनुसरुन मा.उच्च न्यायालय,खंडपीठ औरंगाबाद येथील जनहित याचिका क्र.१८/२०११ मधील दिवाणी अर्ज क्र. १२२४०/२०१३ मध्ये दि.०२.०५.२०१४रोजी प्राप्त आदेशाच्या अंमलबजावणीसाठीकार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी हे पद भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांमधून भरण्याबाबत शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय :-

मा. सर्वोच्च न्यायालय,नवी दिल्ली येथील विशेष अनुमती याचिका क्र.१९८५६/२०१४ मधील दि.१७.०२.२०१७ रोजीच्या आदेशानुसार मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी जनहित याचिका क्र. १८/२०११ मधील दिवाणी अर्ज क्र. १२२४०/२०१३मध्ये दि.०२.०५.२०१४ रोजी आदेशित केल्याप्रमाणे, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, (शिर्डी) अधिनियम २००४, कलम १३(१) अन्वये शासनाला प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी या पदावर भारतीय प्रशासन सेवेतील वरिष्ठ श्रेणीतील अधिकारी प्रतिनियुक्तीद्वारे नियुक्त करण्यात येईल.

२ कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था या पदावर भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्याची पदस्थापना करण्याची कार्यवाही सामान्य प्रशासन विभागातील भा.प्र.से आस्थापनेमार्फत प्रचलित पध्दतीनुसार शासन मान्यतेने करण्यात येईल. तसेच सदर पदावर नियुक्त होणाऱ्या भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्याच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीमधील अटी व शर्ती सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने स्वतंत्रपणे निश्चित करण्यात येतील.

३. कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान या पदावर नियुक्त होणारे भारतीय प्रशासन सेवेतील अधिकारी हे श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था (शिर्डी) अधिनियम - २००४ मधील तरतुदींनुसार कर्तव्ये व जबाबदाऱ्या पार पाडतील.

४. कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान या पदावर सध्या प्रतिनियुक्तीद्वारे नियुक्तीने कार्यरत असलेले श्री. बाजीराव शिंदे, सह निबंधक यांची सेवा सहकार विभागाकडे प्रत्यावर्तीत करण्याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०२२८१७०१४२४७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

N J Jamadar

Digitally signed by N J Jamadar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Secretary And Senior Legal Advisor, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1a04c87922c611cd86db0417549c441857561c576c21b21f3c8d180884505e, cn=N J Jamadar
Date: 2017.02.28 17:03:39 +05'30'

(एन.जे.जमादार)
प्रधान सचिव व विधि परामर्शी

प्रत :-

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, विधि व न्याय विभाग, यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४ .प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,

५. अध्यक्ष,श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी, ता.राहता, जि. अहमदनगर,

६. विश्वस्त, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी, ता.राहता, जि. अहमदनगर,

७.श्री बाजीराव शिंदे, सह निबंधक तथा कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी, ता.राहता, जि.अहमदनगर

८. निवड नस्ती/का.१६.